<u>बदली</u><br>**उपअभियंता (स्थापत्य)**<br>**सार्वजनिक बांधकाम विभाग.**

**महाराष्ट्र शासन**<br>**सार्वजनिक बांधकाम विभाग**<br>**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१७/ प्र.क्र. ९५/सेवा-२**<br>मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक<br>मंत्रालय, मुंबई-४०० ०३२<br>तारीख: ३१.५.२०१७

# शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ सार्वजनिक बांधकाम विभागातील खालील अधिका-यांच्या नियतकालीक/प्रशासकीय कारणास्तव, त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी बदल्या करण्यात येत आहेत.

**सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद**

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री. सी.ए.गवळी | उप कार्यकारी अभियंता, सा.बां (पश्चिम) विभाग, औरंगाबाद | सा.बां. उप विभाग, मिरज |
| २. | श्री.एस.व्ही. पार्डीकर | सा.बां. उप विभाग, पालम | जि.प. (बांध.) उप विभाग, वसमत |
| ३. | श्री.मुस्ताक अहमद | सा.बां. उप विभाग, हिमायतनगर | उप कार्यकारी अभियंता, जि.प. बांध. दक्षिण विभाग, नांदेड |
| ४. | श्री. वाय.बी. कुलकर्णी | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद | मार्ग प्रकल्प उपविभाग, औरंगाबाद |
| ५. | श्री. एस.एम. मांगुळकर | सा.बां. प्रादेशिक विभाग, कार्यालय, औरंगाबाद | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, औरंगाबाद |
| ६. | श्री.अशोक बाबाराव भोसले | सा.बां. उपविभाग धारुर | सा.बां. उप विभाग, कर्जत |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. उपरोक्त उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचन अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११६५१२२३६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.06.01 16:13:59 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद/नाशिक/पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.

४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/परभणी/जालना/लातूर/बीड/उस्मानाबाद/हिंगोली/नांदेड/अहमदनगर/सांगली.

५. सर्व संबंधीत उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्या मार्फत.

६. मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) /मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. प्रधान सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.

८. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.